महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: क्रीस्पर्धा-३२२१/प्र.क्र.२४/क्रीयुसे-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२५.

**वाचा:-**

१) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.राक्रीधो १०९६/प्र.क्र.३३०/क्रीयुसे-१, दि.३१.०७.१९९७

२) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/राक्रीडास्पर्धा/२०१९/का-६, दि.२२.०८.२०१९ व दि.११.११.२०२०

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.पुनर्वि-२८२४/प्र.क्र.९९/अर्थसंकल्प, दि.२८.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

राज्यातील क्रीडा व खेळाच्या विकासासाठी विविध स्तरावर कार्यरत असलेल्या नोंदणीकृत संस्था/संघटनांना संदर्भाधिन क्र. १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील नियम क्र. ११,१२,व १३ अन्वये शासनातर्फे महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून अधिकृत राज्य/राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येते. मागणी क्र.ई-३ (०९) (०९) राष्ट्रीय स्तरावर क्रीडा कौशल्य व तंत्र संबंधास खास शिक्षणाचा दर्जा वाढविणे (ऑलिम्पिक अभियान) (कार्यक्रम) ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) (२२०४-५३६८) या लेखाशिर्षामधून पुनर्विनियोजनाने उपलब्ध झालेल्या रू.१००.०० लक्ष इतका निधी महाराष्ट्र स्क्वॅश रॅकेट असोसिएशनच्या वतीने आयोजित पुणे येथे संपन्न झालेल्या ७६ व्या राष्ट्रीय स्क्वॅश स्पर्धेच्या आयोजनाकरिता रू. १००.०० लक्ष ( अक्षरी रूपये एक कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील क्रीडा व खेळाच्या विकासासाठी विविध स्तरावर कार्यरत असलेल्या नोंदणीकृत संस्था/ संघटनांना महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून अधिकृत राज्य/राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येते. त्यानुसार महाराष्ट्र स्क्वॅश रॅकेट असोसिएशनच्या वतीने आयोजित पुणे येथे संपन्न झालेल्या ७६ व्या राष्ट्रीय स्क्वॅश स्पर्धेच्या आयोजनाकरिता रू. १००.०० लक्ष (अक्षरी रूपये एक कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात होणारा खर्च ““मागणी क्र. ई-०३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०२) (०२) (०३) महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेमार्फत नोंदणीकृत क्रीडा संस्थांना सहायक अनुदान (राज्य) (कार्यक्रम) (२२०४-१९४३), ३१, सहायक अनुदान (वेतनेवर) ” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदी मधून भागविण्यात यावा.

I. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. तसेच, सदर निधी शासन लेख्याबाहेर बँक खात्यात ठेवू नये.

II. वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

III. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दि.१७ मार्च, २०२५ च्या परिपत्रकातील अटी व सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित उपसंचालक/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१९३/१४७१, दि.११.०३.२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४०३/व्यय-५, दि.१९.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१६१०३५६०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHOK HANMANLU DAMAYYAWAR
Date: 2025.03.29 16:11:21 +05'30'

**( अशोक ह. दमय्यावार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री, (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
४. मा. उपमुख्यमंत्री, (नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
५. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन , मुंबई
६. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन , मुंबई
७. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, मुंबई.
९. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
१०.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
११.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१५.महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१६.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई(क्रीडा संचालनालयामार्फत) .
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत )

१८.  वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत) .
१९.लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
२०.सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
२१.वित्त विभाग,व्यय -५ /अर्थ -८, नियोजन विभाग (का. १४७१ ) मंत्रालय, मुंबई,
२२.अवर सचिव, अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३.निवड नस्ती (क्रीयुसे-२).